**राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, गोखलेनगर, पुणे येथील बहिस्थ व्याख्यात्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०११/प्र.क्र.३३८/पदुम-४,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २० ऑगस्ट २०११**

**वाचा -** १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-१००७/प्र.क्र.१७७/पदुम-४, दि.१.११.२००८.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.प्रा/राप्रकें/तांत्रिक/१०२५-२६/२०११, दि. २९.०३.२०११.

**प्रस्तावना :-**

राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, गोखलेनगर ही पशुसंवर्धन विभागाची राज्यस्तरावरील प्रशिक्षण देणारी एकमेव संस्था असून, या संस्थेत महाराष्ट्र राज्यातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी विविध प्रशिक्षण वर्ग आयोजित करण्यात येतात. प्रशिक्षणार्थींना विविध नाविन्यपूर्ण/अद्ययावत माहिती व प्रात्यक्षिके देण्यासाठी तज्ञ बहिस्थ व्याख्यात्यांचे मार्गदर्शन उपलब्ध होणे आवश्यक आहे तसेच प्रशिक्षणार्थींना अद्ययावत तांत्रिक ज्ञान देऊन त्यांची व्यावसायीक कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीकोनातून प्रयत्न होणे अत्यंत गरजेचे आहे. अद्ययावत ज्ञानामुळे क्षेत्रिय स्तरावरील तांत्रिक स्वरूपाच्या अडचणी सोडविण्यास निश्चितच लाभ होणार आहे. त्या अनुषंगाने पशुसंवर्धन विभागाच्या प्रशिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी कृषि विभागाच्या धर्तीवर बहिस्थ व्याख्यात्यांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने वाचा येथील पत्र दि.१.११.२००८ तसेच या संदर्भात यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करून खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

प्राचार्य, राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, पुणे येथे आयोजित करण्यात येत असलेल्या विविध प्रशिक्षणासाठी बहिस्थ व्याख्यात्यांना प्रति ९० मिनिटांच्या व्याख्यानासाठी रू ३००/- (रूपये तीनशे मात्र) इतके मानधन अदा करण्यास याद्वारे शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, पुणे येथे आयोजित करण्यात येत असलेला प्रत्येक प्रशिक्षण वर्ग एकूण ३० तासांचा असल्याने राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्रावरील उपलब्ध अधिकारी वर्गाने प्रति प्रशिक्षण वर्गापैकी ६० टक्के

...जेच १८ तास व्याख्याने घ्यावीत. उर्वरित प्रति प्रशिक्षण वर्गापैकी ४० टक्के व्याख्याने म्हणजेच १२ तास ही बहिस्थ ...ख्यात्यांची आयोजित करावीत.

एका प्रशिक्षण वर्गासाठी बहिस्थ व्याख्यात्यास एकदाच निमंत्रित करण्यात यावे.

उपरोक्त प्रमाणे बहिस्थ व्याख्यात्यांना द्यावयाच्या मानधनावरील खर्च सन २०११-१२ मध्ये योजनेत्तर योजनेत मंजूर व उपलब्ध असलेल्या तरतूदीस अधिन राहून करण्यात यावा.

बहिस्थ व्याख्यात्यांच्या मानधनात करण्यात आलेली वाढ सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात आणावी.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२६२/११/व्यय-२ दि.५.८.२०११ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नांवाने,**

**(डॉ.मा.ना. सवाईसोनकांबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. प्राचार्य, राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, गोखलेनगर, पुणे-१६.
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. अवर सचिव, पदुम-३/कक्ष अधिकारी पदुम-१/१अ/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती.